सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी कोल्हापूर या प्रशिक्षण संस्थेस अनुदान वितरित करणेबाबत. लेखाशिर्ष-२४१५ ३२१.
( पहिला हप्ता वेतन / वेतनेतर )

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२२ /प्र.क्र.२० /आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २६ एप्रिल, २०२२.

**वाचा -**

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र.८४५/०९, दिनांक १७.०९.१९९३.
२) शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दि. २३.९.१९९८.
३) शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.

**प्रस्तावना -**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (०१) (०२) कोल्हापूर जिल्ह्यातील गारगोटी येथे ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे(अनिवार्य) (संकेतांक क्र. २४१५ ०३२१), (योजनेत्तर) (दत्तमत) (मागणी क्र.एल-३) अंतर्गत ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रु. ८९१.०० हजार (रुपये आठ लक्ष एक्याण्णव हजार फक्त) व ३६ सहायक अनुदाने (वेतन) साठी रु. ९८४८.०० हजार (रुपये अठ्ठयाणव लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त) असे एकूण रुपये १०७३९.०० हजार ( रुपये एक कोटी सात लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी पहिला हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ नुसार सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पिय मंजूर अनुदानातून निधी वितरित करण्याच्या वित्त विभागाच्या सूचना आहेत. त्या अनुषंगाने सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून ३६ सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १५ % मर्यादेत

रु.१४७७.२० हजार (रुपये चौदा लक्ष सत्याहत्तर हजार दोनशे पन्नास फक्त) इतके अनुदान तसेच ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ७ % मर्यादेत रु. ६२.३७ हजार (रुपये बासष्ट हजार तीनशे सत्तर फक्त ) इतके अनुदान पहिला हप्ता म्हणून ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी जि. कोल्हापूर यांना वितरित करण्यात येत आहे.

२. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण ११९८/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९/४४, दिनांक १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने उपायुक्त (आस्था), पुणे विभाग, पुणे यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

३. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी .

४. हा खर्च " २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (०१) (०२) कोल्हापूर जिल्ह्यातील गारगोटी येथे ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे(अनिवार्य) (संकेतांक क्र. २४१५ ०३२१), (योजनेत्तर) (दत्तमत) (मागणी क्र.एल-३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे . सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना), हे काम पाहतील.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे . याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १७/०४/२०१५ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२६१२२८३४५५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: cn=SUNIL SURYAKANT HANJE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2022.04.26 14:35:41 +05'30'

( सुनिल हंजे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (दोन प्रती)
२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (नोंदणीकृत डाकेने)
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
६. संचालक, श्री.मौनी विद्यापीठ गारगोटी, जि.कोल्हापूर
७. प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर (२ प्रतींसह)
८. वित्त विभाग (का.क्र.अर्थसंकल्प-१७/व्यय १५)
९. कार्यासन.क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास विभाग
१०. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५